# लिओनार्दो दा विंची

लेखन: इबी लेप्स्की

चित्रे: पाओलो कार्डोनी





*लिओनार्दो* हा खूप जिज्ञासू आणि धीट मुलगा होता. दररोज गावातून फेरफटका मारताना तो अनेक गोष्टी न्याहाळून त्यावर शंका विचारत असे.

इंद्रधनुष्यात इतके विलक्षण रंग का असतात?

तळ्यात खडा टाकला की पाण्यात वर्तुळाकार तरंग का उठतात? ते दूर दूर पसरत का जातात?



झऱ्याच्या पाण्यात डहाळी टाकल्यावर पाणी तिला कुठे वाहात नेतं?

लिओनार्दोच्या वडिलांना आपल्या मुलाचा फार अभिमान वाटत असे. ते सतत कामात व्यस्त असत. त्यांना अनेक गोष्टींमध्ये रस होता आणि त्यांना अनेक नवनव्या कल्पना सुचत असत.



लिओनार्दो एका गावात राहात असे. त्याचे वडील शहरात काम करत. लिओनार्दोला भेटण्यास ते अनेकदा गावी येत. गावी आल्यावर, आपला मुलगा कसा आहे, त्याने इतक्या दिवसांत काय काय केलं हे ऐकायला ते खूप उत्सुक असत.

एकदा कुणीतरी त्यांना सांगितलं की लिओनार्दोने इतक्या दिवसांत बांधकाम करण्याव्यतिरिक्त काहीही केलं नाही. चिखल आणि दगड वापरून लिओनार्दोने एक किल्ला आणि त्याचे उंच मनोरे बांधले होते. त्याने एक लाकडी पूल आणि एक वातचक्रदेखील बनवले होते. वातचक्र वाऱ्यावर छानपैकी फिरत असे.

लिओनार्दोचे वडील नोटरी होते. त्यांच्या घराण्यात गेली दोनशे वर्षे सगळे पुरुष नोटरीच होते. नोटरी कायदेशीर दस्तऐवज सांभाळण्याचं काम करत.

वातचक्र घेऊन धावणाऱ्या लिओनार्दोला पाहून त्याच्या वडिलांच्या मनात आलं, “त्याच्या या छंदाचं कौतुक वाटतं. पुढे जाऊन हा एक दिवस इंजिनीअर बनेल किंवा कदाचित आर्किटेक्ट. तो नोटरीचं कंटाळवाणं काम करण्याची आमच्या घराण्याची परंपरा मोडीत काढेल.”



लिओनार्दोचे वडील खुश होऊन शहरात परतले. त्यांनी मुलासाठी इंजिनीअरींग, यांत्रिकी आणि आर्किटेक्चर विषयांची पुस्तकं विकत घेतली. पण गावी परतल्यावर, लोकांनी त्यांना सांगितलं की बऱ्याच दिवसांत त्यांच्या मुलाने किल्ले, पूल आणि वातचक्र बनवले नाही. आता तो निसर्गाचा अभ्यास करू लागला होता. तो मुंग्या आणि इतर किटकांचं निरीक्षण करू लागला होता. तो खडे गोळा करू लागला होता. तो तासनतास फुलं, पानं आणि ओकच्या फळांचे आकार, रचना तपासू लागला होता.



“माझं चुकलंच बहुधा,” लिओनार्दो एका किड्याकडे मंत्रमुग्ध होऊन पाहात असताना त्याच्या वडिलांच्या मनात आलं. “लिओनार्दो नैसर्गिक विज्ञानात पांडित्य मिळवेल असं दिसतंय. तो नामांकित वनस्पतीतज्ञ किंवा कदाचित भूगर्भतज्ञ बनेल. पण तो नोटरी बनायची आमच्या घराण्याची कंटाळवाणी परंपरा नक्कीच मोडीत काढेल.”



खुश होऊन त्याचे वडील पुन्हा शहरात परतले. त्यांनी वनस्पतीशास्त्र, नैसर्गिकशास्त्र आणि भूगर्भशास्त्र या विषयांची पुस्तकं विकत घेतली. पण ते गावी परतले तेव्हा लोकांनी त्यांना सांगितलं की आता त्यांचा मुलगा किटक, खडे आणि फुलांचा अभ्यास करत नाही. आता तो फक्त चित्रं काढत बसतो. त्याला जे दिसेल त्याचं चित्र तो काढतो: शेतकऱ्याची अवजारं, पाण्याची भांडी, मेंढ्या...

....ऑलिव्हची झाडं, चाऱ्याचे गठ्ठे. तो मोठ्या मोठ्या भौमितिक आकृत्या आणि शोभेच्या नक्षीदेखील काढतो.

लिओनार्दो जमिनीवर खडूने काढलेल्या मोठ्या मोठ्या चौरसांच्या आतबाहेर उड्या मारत होता. ते पाहून वडिलांच्या मनात आलं, “माझा गैरसमज झाला बहुधा. लिओनार्दो चित्रकार बनेल, खात्रीने. तो महान चित्रकार बनेल आणि कंटाळवाणा नोटरी बनायची परंपरा मोडेल.”



खुश होऊन लिओनार्दोचे वडील शहरात परतले. त्यांनी रंग, कुंचले, चित्राचे मोठे कागद, भूमितीची पुस्तकं आणि शोभेच्या नक्षी विकत घेतल्या. पण गावी आल्यावर लोकांनी त्यांना सांगितलं की लिओनार्दोने आता चित्र काढणं बंद केलं होतं.

त्याला आता पक्ष्यांसारखं उडण्यात रस वाटत होता. तो तासनतास उडणाऱ्या पक्ष्यांचं निरीक्षण करू लागला होता, ते पंख कसे फडफडवतात, शेपटी कशी हलवतात, हवेवर कसे तरंगतात आणि जमिनीवर कसे येतात हे सगळं तो न्याहाळू लागला होता.



उडण्यात रस निर्माण झाल्यावर लिओनार्दोला हवेबद्दलही रस वाटू लागला. वारे ढगांना कसे वाहून नेतात, जमिनीवर पडणारी झाडांची पानं वाऱ्याच्या झोताबरोबर अलगद गोल गोल कशी फिरतात याचं तो निरीक्षण करू लागला.

लिओनार्दोने मोठी पतंग बनवली जी आभाळात उंच उडू लागली.

पण यावेळी लिओनार्दोच्या वडिलांना उत्साह वाटला नाही.

“माझा मुलगा चंचल आहे,” लिओनार्दो पतंगाचा दोरा धरून धावतोय, हे पाहून त्यांच्या मनात आलं. “तो शंभर गोष्टी करू पाहातोय. मग कंटाळून त्या बंदही करतोय. बहुधा लिओनार्दोसुद्धा शेवटी नोटरी म्हणूनच काम करणार.”



निराश होऊन लिओनार्दोचे वडील शहरात परतले. त्यांना आपल्या मुलाची चिंता वाटू लागली. लिओनार्दो पुढे जाऊन काय बनणार, याचा अंदाज त्यांना येईना.



पण ते पुन्हा गावी परतले तेव्हा लोकांनी त्यांना सांगितलं की त्यांचा मुलगा पुन्हा किल्ले, पूल आणि वातचक्र बनवू लागला होता. शिवाय, त्याने एक पवनचक्कीसुद्धा बनवली होती आणि ती व्यवस्थित काम करत होती.



लोक सांगू लागले की लिओनार्दो पुन्हा किटक, खडे, फुलं आणि पानांचं निरीक्षण करू लागला होता. शिवाय, तो कोल्हा, साळिंदर, बॅजर या मोठ्या जनावरांचाही अभ्यास करू लागला होता.



त्यांना सांगण्यात आलं की लिओनार्दो पुन्हा त्याने पाहिलेल्या दृश्यांची चित्र, भौमितिक आकृत्या, शोभेच्या नक्षी काढू लागला होता. शिवाय, तो त्याच्या परिचयातल्या लोकांची पोर्ट्रेटही काढू लागला होता.



लिओनार्दोच्या वडिलांनी हेदेखील ऐकलं की त्यांच्या मुलाला अजूनही पक्षी कसे उडतात, हवा कशी वाहाते हे जाणून घेण्यात आणि शिवाय स्वत: उड्डाण करण्यात रस आहे. खरंतर, लिओनार्दोने दोन मोठे पंख बनवले होते आणि ते लावून त्याने गोदामाच्या छतावरून उडी मारली होती. सुदैवाने, तो खाली चाऱ्याच्या ढिगावर पडला आणि वाचला.

आणखीही नवं काही घडलं होतं. आता लिओनार्दो रात्र रात्र जागून ग्रह, तारे, चंद्र यांचं निरीक्षण करू लागला होता.

लिओनार्दोच्या वडिलांना अचानक उमगलं की त्यांचा मुलगा चंचल नव्हता आणि त्याला वेगवेगळ्या गोष्टी करण्याचा कंटाळाही येत नव्हता. लिओनार्दोला खरंतर प्रत्येक गोष्टीत रस होता आणि त्याचं कौशल्य प्राप्त करण्याइतकी क्षमता त्याच्यात होती.



लिओनार्दो मोठा झाला तेव्हा त्याच्या वडिलांची इच्छा होती तसं इंजिनीयर, आर्किटेक्ट, वनस्पतीतज्ज्ञ, चित्रकार आणि संशोधक असं सगळं काही बनला. सोबतच त्याने आणखीही बऱ्याच गोष्टी केल्या. लिओनार्दो दा विंची हा सर्वकालिन महान विचारवंत तसंच कल्पक निर्माताही होता.

समाप्त